# पंचम खंड

---

## [ लंबोदरचरित्र ]

### असित नैध्रुव संवाद

सूत :–शौनका! दक्षप्रजापतीनें मुद्गलास पुनः अशी विनंती केली की, 'मला लंबोदराचे चरित्र कृपा करून सांग.' ही विनंति ऐकून मुद्गलऋषीलाही हर्ष झाला आणि त्याने असित व नैध्रुव यांचा जो संवाद झाला तो सांगण्यास सुरवात केली. पूर्वी नैध्रुव या नांवाचा एक महातपस्वी, हजार वर्षेपर्यंत तपश्चर्या करून एक दिवस त्याच्या येथे असित नांवाचा एक महायोगी प्राप्त झाला. कुशल प्रश्न झाल्यावर असिताने नैध्रुवाला विचारले. 'नैध्रुवा तू तपश्चर्या करून देहाला कां कष्टवीत आहेस? कृच्छ्र, चांद्रायण इत्यादि देहाला ताप देणारी व्रते म्हणजे तपश्चर्या नव्हे. हे केवळ बाह्य देहदंडन आहे. याने जन्ममरण चुकावयाचे नाही तसेच प्राणायाम करून व षट्चक्राचा (सहा चक्रांचा) भेद करून अंतर्ध्यानाने आपल्या मस्तकात जे 'सहस्रदलपद्म' आहे, तद्गत वायूचा रोध करावयाचा, त्रिकाल ज्ञान मिळवून अष्ट सिद्धि संपादन करून घ्यावयाच्या, इत्यादि योगाला तपश्चर्या म्हणतात; पण असले तपस्वीही जन्ममरणाच्या

चक्रांतून सुटत नाहीत. तपाचा एक तिसरा मार्ग आहे. ह्या मार्गाने मात्र चित्ताला एकाग्रता येते. सर्वत्र आत्मस्वरूप दिसू लागते. शमदमाची प्राप्ति होते. विषय वैराग्य सिद्ध होते. नंतर निरोधयोगाने चित्तरोध होऊन 'मी ब्रह्म आहे' असा प्रत्यय येतो व हा योगी नित्य संतुष्ट नित्य शांत असा होतो. हा योग ह्मणजे तपश्चर्या होय हा गणेश उपासनेच्या साधनाने मात्र सिद्ध होतो. एकदा मी ब्रह्मदेवाचे येथे जाऊन त्याला खऱ्या शांतीचा मार्ग विचारण्यास प्रारंभ करणार होतो. इतक्यांत तेथे वसिष्ठ व विश्वामित्र येऊन त्यांनी ब्रह्मदेवाला विचारले. 'आमच्यामध्ये श्रेष्ठ तपस्वी व श्रेष्ठ योगी कोण' दोघेही रागातच होते. हे पाहून ब्रह्मदेव ह्मणाला जोपर्यंत जीवाच्या अंतःकरणांत क्रोधाचा संचार आहे, शांतीचा पूर्ण संचार नाही, तोपर्यंत त्या जीवाला तपस्वी असे ह्मणताच यावयाचे नाही. तुह्मी उभयताही क्रोधवश झालेले आहात, ह्मणून तुह्मी तपस्वी नव्हेत. तुह्माला क्रोधाचा थोडासा वृत्तांत सांगतो ऐका.

## भस्मासुराला शंकराच्या वराची प्राप्ती–विष्णुद्वारा भस्मासुराचा नाश

पूर्वी शकुनीला भस्मासुर या नावाचा मुलगा झाला. मुंज झाल्यावर शुक्राचार्यांच्या घरी जाऊन भस्मासुराने सर्व विद्या संपादन केली. तसेच गुरुजीपासून त्याने शिवपंचाक्षरी मंत्राची दीक्षा घेतली. नंतर तो अरण्यांत गेला आणि सर्वांगाला भस्म विलेपन करून त्याने हजारो वर्षे त्या शिवपंचाक्षरी मंत्राचा जप केला. ही त्याची तपश्चर्या पाहून शंकर प्रसन्न झाला आणि 'ज्याच्या मस्तकावर तूं आपला दक्षिण हस्त ठेवशील तो तत्काल प्राणाला मुकून

भस्मरूप होईल.' असा वर देता झाला, व आपण गणांसह कैलासाला निघून गेला. इकडे राक्षस आपल्या मनाशी विचार करीत राहिला की, नग्न, भांगट, दरिद्री व वृद्ध अशा ह्या शंकर वैराग्याला, अति लावण्यवति, सर्व विश्वाला सौंदर्य देणारे हे एक रत्न, जो जगदंबिका पार्वती, बायको मिळाली आहे! ही गोष्ट अन्यायाचो आहे ह्या जोगड्याला ही सुंदरी मुळीच योग्य नव्हे. हीला योग्य पति म्हणजे माझ्यासारखाच ऐश्वर्यवान, बलवान व बुद्धिवान नवरा असला पाहिजे चला तर आपण कैलासाला जाऊन पार्वतीचे हरण करू या. असा विचार करून तो कैलासाला गेला आणि आपला उजवा हात वर उचलून शंकराच्या मस्तकावर ठेवण्याकरता क्रोधाने धावतच सिंहासनापर्यंत गेला. हे संकट पाहून शंकर तेथून पळाला. त्याच्या मागे भस्मासुर लागला. पळत असता शंकराने व तेथेच हजर असलेल्या विष्णूने गणपतीची प्रार्थना करून आपल्यावर आलेले संकट निवारण्याची विनंती केली. ती प्रार्थना ऐकून गणपतीने विष्णूच्या अंतःकरणात शिरून त्याला मोहिनीचे स्त्रीस्वरूप धारण करण्याविषयी आज्ञा केली. लागलीच विष्णूने स्त्रीवेषधारण केला. विष्णु आपल्या सुंदर वेषाने व आपल्या मोहक स्वरूपाने भस्मासुराचे चित्त आकर्षिता झाला आणि मोहिनीपाशी जाऊन त्याने तिच्या अनेक विनवण्या केल्या. शेवटी तीं ऐकत नाही असे पाहून 'सर्वस्वी मी तुझा दास आहे. तूं जे काय सांगशील ते काम करण्यास मी नेहमी सिद्ध असेन,' अशी दोन्ही हात जोडून विनंती केली. ही त्याची आर्जवे पाहून त्याला जास्तच मोहात घालण्याकरिता मंद स्मित करून मोहिनी त्याला म्हणाली 'सर्वांना मोह घालणारी मी मोहिनी आहे. माझ्या आज्ञेमध्ये निरंतर वागावयाचे, असे कबूल करीत असशील तर मी तुझ्या घरी येऊन राहीन. पण

आता तूं इतकेंच कर की, तुला संतुष्ट करण्याकरिता मी नृत्य करते, त्याप्रमाणे तूंही माझ्यासारखाच नाचावयास लाग. असा तूं नाचू लागलास तर मला साक्ष पटेल की, तू माझे ऐकशील.' वेडा झालेल्या राक्षसाने अर्थातच 'होय' ह्मटले. मोहिनीने आपल्या नृत्यकौशल्याने भस्मासुराचे मन सर्वथा स्ववश केले, आणि आपण नाचताना 'जे जे हावभाव आपण करू तसे करण्यास हा सिद्ध झाला आहे' असे पाहून तिने कर्नाटकी नृत्य करण्यास आरंभ केला. नाच अगदी रंगात आल्यावर तिने आपला दक्षिण हस्त लीलेने स्वमस्तकावर ठेवला. तेंव्हा त्यानेही गणेशमायेने भ्रांत होऊन वेडापिसा झालेल्या त्या भस्मासुराने, तसेच केले आणि आपल्या हाताने आपणास जाळून घेतले! आता भस्मासुराने त्या महामोहक मोहिनीला पाहिले तसेच शंकरानेही पाहिले होते. भस्मासुर मेल्यावर शंकरही मोहिनीशी लाडीगोडी लावू लागला! शंकर मोहित झाला हे पाहून स्त्रीरूपी विष्णूने पलायन केले. शंकर पाठीमागे धावला. याप्रमाणे बराच वेळ धावपळ झाल्यावर, विष्णूने पाहिले की, शंकर आपणास धरणार, तेंव्हा त्याने स्वस्वरूप धारण केले. मोहिनी स्त्री नव्हे, विष्णु आहे हे समजल्यावर शंकर खिन्न झाला व त्याचे वीर्यही तत्क्षणीच स्खलन पावले. असो; नंतर विष्णूचे व गणपतीचे स्तवन करून शंकर कैलासाला गेला व इतर देव आपआपल्या स्थानाला गेले.

## क्रोधासुराला सूर्यद्वारा वराची प्राप्ती—लंबोदराद्वारा क्रोधासुर गर्वपरिहार व त्यास शांतिप्राप्ती

**सूत :—** मुनीहो! ब्रह्मदेव पुढे सांगतात; 'त्या शंकरवीर्यापासून एक श्यामवर्ण व तांम्रनेत्र (तांबड्या डोळयांचा) प्रतापी राक्षस

उत्पन्न झाला. देव स्वस्थानाला गेल्यावर तो जन्मभूमीपासून निघाला व शुक्राकडे गेला. तेथे जाऊन ' माझे पालनपोषण करा, व मला विद्यादान द्या ' अशी त्या राक्षसाने शुक्राची विनयपुरःसर प्रार्थना केली. शुक्राने त्याचे नाव क्रोधासुर असे ठेविले. पुढे जातकर्मादि मौंजिबंधनापर्यंतचे सर्व संस्कार शास्त्रोक्त विधीने झाले. नंतर क्रोधासुराने सर्व विद्या संपादन केली. पुढे त्याचे लग्नही झाले. नंतर शुक्र गुरुजींच्या सांगण्यावरून त्याने एका पायावर उभे राहून व ऊर्ध्व दृष्टि ठेवून सूर्याचे ध्यान करीत सूर्यमंत्राचे पुरश्चरण केले. हजार वर्षे झाल्यावर सूर्य प्रसन्न झाला आणि ' जन्ममरणयुक्त जे देव किंवा इतर प्राणी आहेत त्यांपासून तुला भीति नाही. तू ब्रह्मांडावर आपली सत्ता स्थापन करशील. तुझ्यासारखा ऐश्वर्यवान कोणीही असणार नाही ' असे इष्ट वर क्रोधासुरास दिले. सूर्य स्वस्थानी गेल्यावर क्रोधासुर मोठ्या आनंदाने घरी आला व आपल्या तपश्चर्येचा व तपःसिद्धीचा वृत्तांत आपल्या इष्ट मित्रास सांगून त्यांसही आनंदविता झाला. कांही दिवस गेल्यावर शुक्रसंमति घेऊन क्रोधासुराने आवेशनामक एक शोभायमान नगरी निर्माण केली. तेथे दाही दिशांचे राक्षस आनंदाने रहावयास आले. पुढे शुक्रानी क्रोधासुरास राज्याभिषेक केला. नंतर क्रोधासुराने ब्रह्मांडविजयाचा संकल्प केला आणि चतुरंग सेना सिद्ध करून त्याने पृथ्वीभर दिग्विजय केला. पृथ्वीवर जेवढे जेवढे म्हणून राजे होते, तेवढ्या सगळ्यांनी त्याला प्रतिवर्षी करभार देण्याचे कबूल केले. याचप्रमाणे क्रोधासुराने पाताळातील नागलोकावरही आपली सत्ता स्थापित केली. नंतर, देवलोकावर क्रोधासुर स्वारी करणार हे ऐकूनच देवांनी आपापली स्थाने सोडली व अशा प्रकारे स्वर्गलोकीही क्रोधासुराचा

अंमल चालु झाला! मग राहिले ब्रह्माविष्णुशंकारांचे सत्य, वैकुंठ व कैलासलोक. हेही जिंकून घ्यावे, असाच क्रोधासुराचा संकल्प होता. त्या त्या लोकांस गेल्यावर ब्रह्मादिदेवनायकांनीही आपापली स्थाने सोडली व अरण्यात गेले! नंतर क्रोधासुराचे दैवत जो सूर्य त्याला देवकक्षेतून आपल्या पक्षात आणावा असा क्रोधाने संकल्प केला व सूर्यांकडे त्यानें रावण या नांवाचा दूत शिष्टाईकरिता पाठविला. सूर्याला राक्षसांचे म्हणणे पसंत पडले नाही व तो रानांत निघून गेला. याप्रमाणे आपल्यास आता कोणी शत्रु उरला नाही व सर्व त्रैलोक्याची सत्ता आपल्या हातांत आली आहे असे पाहून क्रोधासुर विषयामध्ये दंग होऊन स्त्रीमांसमदिरादिकांचे अतिरिक्त सेवन करूं लागला. त्याच्या राज्यात वैदिक कर्माला स्थान मिळेनासे झाले. अर्थातच देव भयकंपित झाले. वसिष्ठाकडे जाऊन त्याच्या दीनवाणीने संकटाच्या उपशमनाचा मार्ग विचारूं लागले. वसिष्ठांनी 'स्वानंदवासी जे मुख्य गणेशब्रह्म ते जन्ममरणशून्य आहे, त्याची सेवा करा म्हणजे तुमच्या सर्व विघ्नांचा परिहार होईल' असे सांगितले. देवांनी वसिष्ठाच्या उपदेशाप्रमाणे गणपतीची सेवा केली आणि त्यास प्रसन्न करून घेऊन 'क्रोधासुराचा वध करा. त्याने सर्व जगताला कर्मशून्य केले आहे. विश्वांत कोठेही धर्म राहिला नाही, तेंव्हा त्याचा वध करून आमचे कार्य करा' असे मागणे मागितले व मिळविले. नंतर 'लंबोदर क्रोधासुराचा वध करील' अशी आकाशवाणी क्रोधासुराने ऐकली. राक्षसमंडळीत गडबड झाली. त्यांनी पुनः अरण्यावर स्वारी करून देवांचा निःपात करण्याचा संकल्प केला. 'दैत्य आले' असे ऐकून देवांनी लंबोदराचे स्मरण केले, तेंव्हा पाशांकुशादि शस्त्रयुक्त, मुषकारूढ, त्रिनेत्र, असे लंबोदर प्रकट झाले.

लंबोदर आले असे राक्षसास कळले; तेंव्हा त्यांनी शुक्राचे स्मरण केले व शुक्रही तेथे सादर झाला. त्यांनी राक्षसास सांगितले की, ' लंबोदरापुढे तुमचे कांहीएक चालणार नाही. त्याला शरण जा; नाही तर तुमचा नाश होईल.' पण आपल्या बलावर ज्यांचा पूर्ण विश्वास अशा त्या राक्षसास शुक्रचार्यांचा उपदेश मान्य झाला नाही. त्यांनी देवावर हल्ला केला. देवांनी लंबोदराचे स्मरण करून युद्धास आरंभ केला. ह्या वेळी फार मोठे घनघोर युद्ध झाले. एक दोन वेळ देवांनी मोठ्या शिताफीने दानवांचा पराजय केला. पण शेवटी राक्षसांच्या बलाचा जोर होऊन त्यांनी देवसेनेस पळावयास लावले. देव पळतात असे पाहून लंबोदरांनी आपला अंकुश दैत्यमंडळावर फेकला. तसेच शुक्रासही त्याने एका गुहेत नेऊन कोंडून ठेवले. पुढे अंकुशसामर्थ्यांने सर्व दैत्यमंडळीत हलकल्लोळ उडाल्यावर लंबोदराची व क्रोधासुराची गांठ पडली लंबोदराचे असह्य तेज, प्रचंड विश्वरूप आणि अवर्णनीय प्रभाव पाहून अंतःकरणाने ठाव सोडलेला क्रोधासुर गडबडला. तो लंबोदरदेवाला शरण गेला. तेंव्हा ' शुक्राने माझे स्वरूप सांगितले तरी तूं ऐकले नाहीस; असो, मला देव आणि तुम्ही राक्षस दोन्ही सारखेच आहांत. दैत्यांस पाताळ, मनुष्यास भूलोक व देवांस स्वर्ग, असे लोक नेमून दिले आहेत. तेथे सर्व लोक आपापल्या धर्मांप्रमाणे चालत असले ह्मणजे स्वानंदामध्ये मी निमग्न असतो; पण अधर्म किंवा अन्याय किंवा भोगशक्ति यांचा प्रभाव झाला ह्मणजे मला देहधारण करून अन्यायाचा व अधर्मांचा उच्छेद करावा लागतो. जन्ममृत्यूचे चक्र माझे स्वाधीन आहे. मला शरण येण्याची बुद्धि तुला झाली आहे तसे कर; नाही तर तुला मी एका क्षणात नामशेष करीन.' ही गंभीर व

कृपापूर्ण वाणी ऐकून व लंबोदराचे ते गंभीर पण दयाळू स्वरूप पाहून क्रोधासुराच्या अंतःकरणांत निष्कामभक्ति उत्पन्न झाली. गणेशब्रह्माचे त्याला ज्ञान झाले. विषयावरील त्याची आसक्ति सर्वथा नष्ट झाली. तो लंबोदराला शरण गेला आणि त्याने त्यापाशी 'दृढभक्ति' मागितली. लंबोदरांनी त्याला वर दिला की, 'ज्या कार्यांत माझे स्मरण होत नाही त्या कार्यांत आपल्या आसुरस्वभावाने तूं विघ्ने उत्पन्न कर व ती कार्ये पुण्यकारी असतील तर त्यांपासून उत्पन्न होणारे ज्ञान व पुण्य या उभयतांचा उपयोग तूच घेत जा. पण माझे भक्त असतील त्यांना मात्र तूं कोणत्याही तऱ्हेचा उपद्रव देऊ नको' याप्रमाणे लंबोदरांनी क्रोधासुराला वर देऊन शांति दिली. क्रोधासुर शांत झाला हे पाहून बाकीचे दैत्य पाताळात निघून गेले व तो शांत झालेला क्रोध तेथेच लंबोदरभक्ति करीत राहिला. आता स्वस्थ झालेल्या देवांनीही परमेश्वराची स्तुति करून सर्वत्र शांति व अखंडभक्ति मागितली व ती देऊन लंबोदर अंतर्हित झाले. नंतर देवानी पश्चिमसमुद्राच्या तीरावर लंबोदराची मूर्ति स्थापन केली आणि लंबोदरभक्ति करीत ते अद्यापिही तेथेच राहिले आहेत.

## ब्रह्मस्वरूपाचे वर्णन

**सूतः**– मुनिहो ! ह्या प्रमाणे ब्रह्मदेवाने वसिष्ठविश्वामित्रास राक्षसरूपी क्रोधाचे चरित्र सांगितले. त्याचा परिणाम असा झाला की, उभयतांनीही आसुरी म्हणून क्रोध व स्पर्धा ह्यांचा त्याग करून शांतिचा स्वीकार केला व आपआपल्या स्थानी निघून गेले. असिताने ही वरील कथा नैध्रुवास सांगितल्यावर लंबोदरनामक ब्रह्मस्वरूपाचे वर्णन केले आणि शेवटी लंबोदराची स्तुति करून त्यांना

आपण प्रसन्न करून घेतल्याची व अखंडभक्ति मागितल्याची कथा सांगितली. नंतर नैधृवाने शमदमयुक्त होऊन लंबोदरप्रणीत योगमार्गाने शांति प्राप्त करून घेतली आणि लंबोदराची अखंडसेवा करीत राहिला.

सृष्टीच्या आरंभकाळी सृष्टिविरचनेसाठी ईश्वरी प्रसाद मिळावा म्हणून ब्रह्मदेवाने व ब्रह्मगणांनी लंबोदराची भक्तिपूर्वक स्तुति केली. तेंव्हा शक्ति नामक देवीच्या स्वरूपाने लंबोदर प्रकट झाले आणि त्या ब्रह्मगणांच्या प्रार्थनेवरून त्यांस ज्ञान देते झाले. ही ज्ञानशक्ति प्राप्त झाल्यावर लंबोदराचे सामर्थ्य अवर्णनीय आहे असा त्यांचा निश्चय झाला. दक्षाने विचारल्यावरून मुद्गल ऋषि सांगतात की, सर्व शक्तिवंत जे ब्रह्म आहे त्याच्या ठिकाणी देहविकार व देहिविकार हे दोन्हीं असतात व नसतातही. ब्रह्मस्वरूप कसे आहे हे कोणालाही सांगता येत नाही. भोग, तप इत्यादिकाचा जो आरोप ब्रह्माचे ठिकाणी ब्रह्मोपदेशक करतात, तो केवळ शिष्याला समजेल असे सांगण्याकरता मात्र असतो, खरा नसतो; म्हणून ब्रह्म बोलले, त्याने भोग भोगिले, तपश्चर्या केली, ब्रह्माला आनंद झाला इत्यादि वाक्यांमध्ये कोणाच्याही प्रकारचा विरोध नाही. निर्गुणावर सगुणाचा आरोप करतात, तो सामान्य जीवांस ब्रह्मबोध व्हावा एतदर्थ होय.

## महिषासुर व देवी युद्ध—गणेशकृपेने देवीद्वारा महिषासुर वध

सूतः— आता महिषासुराची कथा सांगतो. ती ऐका : हा राक्षस ब्रह्मदेवाच्या वराने त्रिभुवनाचा स्वामी झाला होता, हा अजिंक्य, दुष्टबुद्धीचा व क्रूरस्वभावाचा राक्षस त्रैलोक्याचे राज्य करीत

असतां व स्वर्गपाताळादि चतुर्दश भुवनात आपले हस्तक पाठ-
वून तेथे अंमल करीत असता त्रैलोक्यात जिकडे तिकडे कर्मांचा लोप झाला. कर्मलोपाने देवास उपास पडतात हे पाहून देवर्षींनी स्वानंदवासी जी सर्वशक्ति देवी तिची हजार वर्षे तपश्चर्या केली. देवी प्रसन्न झाली आणि 'मी महिषासुराचा वध करते' असे आश्वासन तिने ऋषीस दिले. 'पुरुषापासून तुला भीति नाही' असा महिषासुराला वर होता ह्मणून ऋषीनी देवीस्वरूपाने गणपतीचे आराधन केले. नंतर क्रुद्ध देवी सिंहावर आरूढ होऊन महिषा-
सुराच्या नगरीला गेली. नगराजवळ गेल्यावर तिने मोहिनीचे रूप धरून अति सुस्वर गायन करण्यास प्रारंभ केला. ते ऐकून प्रल्हा-
दादि राजसचिव बाहेर आले आणि तिच्या गाण्याने रंगून जाऊन व स्वरूपाने मोहित होऊन त्यानी तिची प्रार्थना केली की, 'महिषासुराची तूं स्त्री हो. तुझे कल्याण होईल.' ते ऐकून देवी अत्यंत प्रकुप्त झाली, तिने जे क्रोधयुक्त उत्तर दिले ते ऐकून राक्षस चवताळले व तिला जबरीने नगरांत नेण्याकरता ते तिच्यावर तुटून पडले. त्या वेळी तिच्या क्रोधज्वाला इतक्या प्रखर झाल्या की, कित्येक राक्षस ओरडत असताच जळून भस्म झाले. हा गलबला ऐकून महिषासुर बाहेर आला आणि ती देवी आपल्यास वश होत नाही असे पाहून व तिने पुष्कळसे राक्षस मारले आहेत हे जाणून तिच्याशी युद्ध करण्यास त्याने प्रारंभ केला. एक वर्षभर ते युद्ध चालले होते. पण देवीचा पराजय झाला. कारण तिला गणेश-
विस्मरण झाले होते. ते पाहून आपण 'शक्तिस्वरूप असताही महिषासुराचा पराभव करण्याची शक्ति आपणास नाही, यावरून काहीतरी मी चुकत आहे. विघ्नेश्वराचे पूजन व स्मरण मी केले

नाही ह्मणून या संकटात सापडल्ये ' असा विचार करून तिने एकाक्षरी मंत्राने कित्येक वर्षेपर्यंत विघ्नराजाची एकाग्र तपश्चर्या केली. व ही तिची निस्सीम भक्ति पाहून विघ्नेश प्रकट झाले आणि तिने केलेली स्तुति ऐकून ' महिषासुराला मारण्याचे सामर्थ्य तुला येईल. माझ्या ठिकाणी तुझी भक्ति अखंड राहील आणि तुला नित्य शांति मिळेल ' असे वर तिला देते झाले. विघ्नेश्वर अंतर्धान पावल्यावर वेदपारंगत ब्राह्मणांच्या साहाय्याने विघ्नेश्वरांची देवीने स्थापना केली व पूजा, अर्चा नित्य चालेल अशी व्यवस्था केला. नंतर महिषासुराच्या नगरीवर स्वारी करून त्याचा देवीने पराभव केला, त्यास ठार मारले आणि वेदोक्त कर्माचा पुनः प्रसार केला. हे सर्व करून देवी परत विघ्नेशक्षेत्राला आली आणि तेथे शांत मनाने विघ्नेश्वराचे भजन करीत राहिली.

## लंबोदराद्वारे शिव व विष्णूचे गर्वहरण–गणेशाची पूजा सर्वप्रथम करतात त्यांचे कारण

**सूत** :– एकदा विंध्य देशातील गणपतिक्षेत्राची यात्रा करण्याकरता आलेले देव, एक दिवस सहज बोलत बसले असता तेथे असा प्रश्न निघाला की, ' सूर्य, शक्ति, विष्णु, शंकर व गणपति हे पांचही देव गुणांनी, तेजाने व शक्तिने सारखेच असतां गणपतीची पूजा सर्वांच्या आधी का होते? व इतर चार देवांस गणपतीची पूजा कां करावी लागते? या प्रश्नांची चर्चा चालली असता, शक्ति ह्मणाली की, ' लंबोदर एकच देव आहे. ' असे श्रुति ह्मणते. त्याच्या उदरातून सर्व विश्व उत्पन्न झाले आहे. आपण सर्वजण

त्याचे अंश आहोत. तो सर्वांचा आईबाप व सर्वाधार आहे. त्याच्याविषयी संशय प्रकट करणे हे ठीक नव्हे' हे बोलणे पुष्कळास रुचले, पण हे ऐकून शिवविष्णूस मात्र अनावर राग आला. शक्तिचे बोलणे त्यास मुळीच सहन झाले नाही. छातीला हात लावून त्यांनी 'आपले सामर्थ्य दाखव.' असे लंबोदरास मोठ्याने व त्रिवार आव्हान केले, व शक्तिस सांगितले की, 'आमच्यापेक्षा अधिक काही लंबोदरामध्ये दिसेल तर मात्र आम्ही त्याची पूजा करू.' असे ह्मणून शिवविष्णूंनी गणपतीचे आवाहन केले आणि त्याचेपुढे एक मोठा थोरला नैवेद्य त्याने खाण्याकरिता ठेवला. लंबोदर शिवविष्णूचे कपट जाणून होतेच. त्यानी त्या मोठ्या नैवेद्याचा एकच घास केला आणि 'भूक लागली आहे, आणखी कांही पाहिजे' असे त्यास ह्मणाले. दोघेही जण सत्य संकल्पी होते, तेव्हा त्यांनी 'आणखी पुष्कळ अन्न तेथे उत्पन्न व्हावे' असा संकल्प केला; पण तेथे एक शितही दिसेना! हे पाहून दोघेही जण घाबरून गेले व आपल्यामध्ये खरे ईश्वरत्व नाही अशी त्यांची खातरी झाली, तेव्हा लंबोदराचा अपमान केला हे एक संकटच होते, इकडे 'आणखी खावयास' मागणारे लंबोदर डोळे लाल करून त्यांच्याकडे बघत होते, हे निराळेच संकट होते. या विपत्तीमध्ये ते उभयताही शक्तिदेवीला शरण गेले, तेव्हा तिने लंबोदराची चित्त-शांति केली. शिवविष्णूस लंबोदराच्या पायावर घातले आणि आपण लंबोदराला दूर्वा वाहिल्या. ही तिची भक्ति पाहून गणपति प्रसन्न झाले. 'लंबोदराची पूजा आधी का करतात व देवांनीही त्याची पूजा का केली पाहिजे' त्याचे उत्तर निश्चित रीतीने शिवविष्णूस समजले.

पुढे ते नित्य गणपतीची पूजाअर्चा करावयास लागले हे सांगावयास नकोच.

## सुरथाला शांतियोगाचा लाभ

सूत :- पूर्वी सुरथ नावाचा एक राजर्षि होता. त्याने शक्तिची उत्तम तपश्चर्या केली म्हणून त्याला पुढचा जन्म 'सावर्णिमनूचा' प्राप्त झाला. या जन्मातही त्याने शक्तिची उत्तम तपश्चर्या केली. त्या तपश्चर्येला प्रसन्न होऊन शक्तिविनायक प्रकट झाले आणि त्याला शांतियोगाचा लाभ करून देते झाले.

## मायाकराचा लंबोदराद्वारे वध

सूत :- सृष्टि करता करता ब्रह्मदेव एकदा मोहित झाला आणि 'हे सृष्टिरचनेचे काम अखंड कसे चालते ?' याचा विचार करू लागला. त्यावेळी त्याच्या श्वासापासून एक पुरुष उत्पन्न झाला. हा पुरुष आपला पुत्र आहे असे ब्रह्मदेवास कळल्यावर त्याने त्याचे चुंबन घेतले व 'मायाकर' असे त्याचे नांव ठेवले, ह्या मायाकराने जे कांही मागितले; ते ते ब्रह्मदेवाने दिले आणि शेवटी सांगितले की, 'चार तत्वांपासून जी वस्तु उत्पन्न झाली आहे ती तुला वश होईल; आणि तिच्यापासून तुला कसलेही भय असणार नाही!' हे ऐकून मायाकराला हर्षातिरेक झाला. काय करावे हे त्याला सुचेना. असो; नंतर तो दैत्यमंडळीत गेला व आपल्याला मिळालेल्या वरांचा वृत्तांत त्याने 'विप्रचित' प्रमुख राक्षसांस सांगितला. तो वृत्तांत ऐकून त्यांसही आनंद झाला. त्यांनी मायाकराला उपदेश केला की, 'या वरांचा तू उपभोग घेशील तरच जन्माचे

सार्थक होईल, नाहीतर हेच वर तुझ्या उलट होतील !' मायाकराला हे बोलणे खरे वाटले आणि राक्षस सांगतील तसे करण्यास तो कबूल झाला नंतर शुक्रगृही विद्याभ्यास, शुक्रकृत राज्याभिषेक, विषयसेवन, स्वयंमन्यता, पृथ्वी-विजय, स्वर्गाधिपत्य, स्वर्गोपभोग कैलास, वैकुंठ इत्यादि लोकांवर प्रस्थापित केलेले स्वामित्व, सर्वत्र राक्षसहस्तकांची योजना, मृत्युभूमीवर राजधानीची प्रस्थापना, पातालविजय इत्यादि गोष्टी क्रमाक्रमाने होत गेल्या आणि मायाकरासुराम उन्मत्त व भोगासक्त करित्या झाल्या. पाताळलोकी जो शेष आहे, त्याच्या राज्यावर स्वारी झाली तेंव्हा त्याने गणपतीचे स्मरण केले. ह्यापूर्वीच शेषाने तपश्चर्या करून शंकरविष्णूची प्रसन्नता मिळवून घेतली होती व त्यामुळे त्यामध्ये विष्णूचे व शंकराचे दोघांचेही अंश होते. त्याला सहस्र शीर्षे आहेत, हा विष्णूचा अंश होय, तो मृत्युहीन आहे, अनंत आहे, सर्वांचा अंतक आहे, कारण तो शंकराचा अंश आहे. त्याने ब्रह्मांडाचे धारण केले आहे व तो नागांचा स्वामी आहे. ब्रह्मांडांचे धारण करण्याच्यापूर्वी तपश्चर्या करून त्याने गणपतीस प्रसन्न करून घेऊन व ब्रह्मांड धारणाची शक्ति, मुक्ति देणारी अखंडभक्ति, मृत्युशून्यता, उत्तम कीर्ती आणि दिक्पालत्व असे वर प्राप्त केले होते. विष्णूची तपश्चर्या करून त्याचे नित्य दर्शन व्हावे म्हणून त्याला शेषाने आपल्या शरीराची शय्या करून दिली. शंकराची तपश्चर्या करून नित्य दर्शन होण्यासाठी त्याच्या जटाभारावर स्वतःला राहण्याचं स्थान मिळविले तथापि शांति म्हणून त्याला प्राप्त झाली नाही. तेंव्हां 'शांति मिळविण्याला कोणता उपाय योजूं'! असे शंकराला विचारल्यावर त्याने शेषाला गणेशब्रह्माचे स्वरूप, त्याचे

ज्ञान होण्याची साधने, पंचचित्त भूमीच्या निरोधाचा प्रकार इत्यादि सर्व राजगुह्यांची व राजविद्येची दीक्षा दिली. त्या दीक्षेनुसार शेषाने स्वानंदवासी लंबोदराची तपश्चर्या केली; लंबोदर प्रकट होतील इतकी त्यांची प्रसन्नता मिळविली, सदा शांतीचे मागणे मागितले. 'माझ्या अंतःकरणात आपली वसति असावी' हा वर प्राप्त केला आणि 'आपण पुत्ररूपाने माझी सेवा घ्यावी.' असाही लाडिकपणाने एक वर मागितला व मिळविला. नंतर गणपति अतर्धान पावल्यावर त्याचे स्मरण करीत शेष आपल्या भुवनास गेला. गणपतीच्या नाभीच्या ठिकाणी शेषाची वस्ती आहे हे तुम्हास ठाऊकच आहे. योगशास्त्रकर्ता भगवान् पतञ्जलि हा जो शेषाचा अवतार याने सर्पस्वरूपाने गणेशयोगाचे रहस्य श्रीव्यासमुनीस सांगितले. तदनुसार व्यासानेही गणेशयोगाचे उत्तम आराधना केले, म्हणून पतंजलीच्या योगशास्त्रावर भाष्य करण्याचे सामर्थ्य व्यास ऋषीस प्राप्त झाले. असो; इकडे मायाकर राक्षसाच्या त्रासाने उद्विग्न होऊन शेष लंबोदराचे स्मरण करू लागला, हे आत च सांगितले आहे. यावेळी लंबोदर प्रकट झाले, ते त्याच्या हृदयांतून पुत्ररूपाने बाहेर आले! शेषाने हा अवतार पाहून आनंदाने स्तुति केली. पण लवकरच लंबोदरमायेने शेषाने व त्याचे पत्नीस मोह उत्पन्न झाला. त्यामुळे पांच वर्षेपर्यंत हा लंबोदरावतार आहे हे ती विसरली! बालकाचे लालनपोषण त्यांनी मोठ्या कौतुकाने केले. लंबोदर पांच वर्षांचे झाले तेंव्हा पृथ्वीवर कर्मांचा लोप होऊन कित्येक वर्षे झाली होती. देवांस उपवास पडत होते व स्वाहास्वधाकारांचे नांवही ऐकू येत नव्हते. या सर्व अरिष्टांचे शांतीप्रीत्यर्थ व बृहस्पतीच्या सांगण्यावरून सर्व देवांनी व देवर्षींनी लंबोदराची तपश्चर्या केली. लंबोदर प्रकट

झाल्यावर ते स्वतःच देवांस आश्वासन देते झाले की, भिऊं नका. मायाकराचा वध करण्याकरता शेषाच्या घरी मी अवतार घेतो. पण तुम्ही सर्वजण एक गोष्ट करा. ती ही की, तुमच्यामध्ये जे मुख्य चार देव आहेत त्यांच्या अंशाने माझे आरोहण करण्याचे वाहन सिद्ध करा. देवहो ! माझ्या ठिकाणी तुमची भक्ति अखंड राहील !' असे सांगून लंबोदर अदृश्य झाले. नंतर शंकराच्या सांगण्यावरून देवांनी असे ठरविले की, लंबोदराचे वेदविहित वाहन म्हणजे मूषक होय. ज्याप्रमाणे परमेश्वर जीवाच्या अंतःकरणात राहून जीवाच्या नकळत सर्व भोग चोरून आपणच भोगतो, व नकळत सर्व कर्म करवितो, त्याप्रमाणे सर्व भोग भोगणारा व सर्व कर्म करविणारा हा लंबोदराचा मूषक आहे. म्हणून स्वाशाने मूषक सिद्ध करण्याचे ठरवून नंतर चार देवांनी आपआपले अंश दिले व एक मूषक तयार केला आणि त्याला बरोबर घेऊन शेषाचे घरी देव, देवर्षि, पितर इत्यादि मंडळी मोठ्या समारंभाने आली. त्यांनी त्यांचे अभिनंदन केले व 'मायाकरासुराच्या नाशाकरता तुझ्या घरी हा लंबोदराचा अंश झाला आहे. तू धन्य आहेस. आता आमच्यावर कृपा करून आमच्या स्वाधीन लंबोदराला कर; म्हणजे, शेषराज ! तुझ्या कृपेने आम्ही जगत्कार्य करण्याला समर्थ होऊं हे मागणे शेषास अर्थातच पसंत पडले नाही. लंबोदरांनीच जेंव्हा त्याला चार विचारांच्या गोष्टी सांगितल्या तेव्हा त्याने लंबोदरास देवांचे स्वाधीन केले. लंबोदरानी आपले वाहन जे मूषक त्यास पाहिले व तत्कृत स्तुति ऐकिली, तेव्हा त्याचे समाधान झाले. नंतर देवांच्या लंबोदराच्या सांगण्यावरून ब्रह्मदेवाला मायाकराकडे साम करण्याकरता पाठविले; परंतु त्याचा काही उपयोग झाला

नाही. पुढे देवदैत्यांमध्ये ओघानेच लढाई सुरू झाली, ही लढाई कित्येक दिवसपर्यंत अहोरात्र चालली होती. उभयतांकडील हजारो वीर समरांगणांवर मरून पडले. रक्ताचा चिखल, प्रेतांची गर्दी इत्यादिकांनी ती जागा अतिशय भेसुर दिसत होती. पुष्कळ वेळ जय कोणास मिळेल हे कळेना. शेवटी मूषकवाहन लंबोदर आणि मायासुर यांची गांठ पडली, तेंव्हा सर्वांस आतां प्रलयकाल आला असे वाटले. लागलींच लंबोदरांनी बिंदुरूप व ज्योतीरूप असे आपले हातातले कमळ राक्षसाच्या अंगावर फेकले ते कमळ आपल्या हातात घेण्याचा मायासुराने प्रयत्न केला, पण ते त्याच्या हातात न येता गळ्याला चिकटले आणि त्याचा प्राण घेतल्यानंतर लंबोदराच्या हातात पुनः जाऊन बसले. हा राक्षस मेल्यावर स्वर्गातून पुष्पवृष्टि झाली. कृतज्ञभावाने देवांनीही लंबोदराची स्तुति केली व त्याच्याकडून अखंड भक्तीचा वर मिळविला. नंतर लंबोदर अंतर्धान पावले. शेषानेही गणपतीच्या मूर्तीची स्थापना करून गणपतिभक्तीचा संप्रदाय वाढविला.

## सूताचे, गणेशभक्ति करणाऱ्यांना मार्गदर्शन

सूत :- मुनिहो! गणपतिभक्त व्हावयाला गणपतीची खरी भक्ति, परान्नवर्जन, परस्त्रीगमननिषेध, क्रोधलोभत्याग, अभक्ष्यभक्षण-त्याग, द्रोह व मत्सरबुद्धि यांचा त्याग, इतकी साधने अवश्य हवीत. ही साधने तयार झाली म्हणजे उत्तम दिवस पाहून व गणपतिभक्तांची पूजा करून गणेशमंत्राची समारंभाने दीक्षा घ्यावी, आणि गणेश-मंत्राला साक्षीं ठेऊन यथाशक्ति गणेशमंत्राचे पुरश्चरण करावे. पूर्णाहुति झाल्यानंतर विघ्नेशनमनपूर्वक स्वगुरूची पूजा करावी

आणि 'भवसागर तरण्यासाठी आपण दिलेला मंत्र सिद्ध होऊं दे.' अशी त्यांची प्रार्थना करावी. नंतर स्वतः आपण समंत्रक स्नान करून गुरुजींस स्नान घालावे. गणपतिभक्तास मोदकादि इष्टान्ने पोटभर व द्यावी आणि दीक्षेचा विधि पूर्ण करावा. स्नानांत प्रातर्विधि केल्याशिवाय गणपतिगृहांत केव्हांही जाऊं नये. आपली वस्त्रें नेहमी शुद्ध असावी. पूजा करतांना मौन असावे. देवाला नैवेद्य निवेदन केल्याशिवाय आपण कोणत्याही विषयाचा उपभोग घेऊं नये. आपले आहार-विहार योग्य असावे. याप्रमाणे ब्राह्मण गाणपत्यांचे आचरण असावे. क्षत्रिय गाणपत्य असेल तर त्याने होमहवनादि करू नये. त्याने मंत्राचा जप स्वतः करावा व शस्त्रादिकांचा त्याग करावा, तरच त्याला खरा गाणपत्य होता येईल वैश्याने स्ववृत्ति सोडली तर त्याला गणेशदीक्षा घेतां येईल शूद्रांनी हिंसादि कर्मे टाकली तर नाममंत्राने त्यांस गणेशदीक्षा घेता येईल. प्रातःस्नान, संध्यावंदन, पुराणोक्त व वेदोक्त पूजा, गणपतीचे ललाट-दक्षिणकर्ण आदि द्वादशांग पूजन, रक्तचंदन-विलेपन, शमीचीमाळ व मंदारपुष्पमालाग्रहण, शुद्धस्वभाव, मित्रशत्रु-शून्यता, चतुर्थीव्रतधारण, गणेशयात्रा, गणेशनामसंकीर्तन ही गाणपत्याची मुख्य चिन्हे आहेत.

## शमी व मंदार ह्या वृक्षांचे माहात्म्य

सूतः– नंतर मुद्गलाने दक्षाला शमी व मंदार यांचे महात्म्य सांगितले, ते असे; पूर्वी और्व नामक स्वधर्माने चालणारा एक ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण होता. त्याला शमीका नांवाची सुरूप व मोठी गुणवान् अशी एक मुलगी होती और्वाने तिचे लग्न मंदार नांवाच्या

एका विद्वान् शौनकशिष्याशी लावले. पुढे शमीकेस घेउन मंदार आपल्या घरी जात असता वाटेत गणपतिभक्त भृशुंडी यांच्या आश्रमात विश्रांति घेण्याकरता उतरला. भृशुंडीने या दंपत्याचे स्वागत व पाहुणचार मोठ्या भक्तीने केले. परंतु गणपति-प्रसादाने प्राप्त झालेली त्याची सोंड पाहून या तरुण दंपत्यास इतके अनावर हसे लोटले की, भृशुंडीयोग्याला त्यांच्या हसण्याचा संताप आला आणि 'हा माझा अपमान नव्हे, गणपतीच्या सोंडेचा अपमान तुम्ही केला आहे म्हणून तुह्मी दोघेही वृक्षाच्या योनीला जा' असा मी तुम्हांस शाप देतो.' असे म्हणाला. आपल्या मूर्खपणाच्या हसण्याने हे आलेले संकट पाहून त्या दंपत्यास अतिशय वाईट वाटले. त्यांस पश्चात्ताप झाला. भृशुंडीच्या पायावर लोटांगण घालून 'क्षमा करा, जाणूनबुजून आह्मी हसलो नाही; कृपा करून प्रसन्न व्हा' अशी त्याची करुण स्वराने त्यांनी प्रार्थना केली. भृशुंडी दयाशीलच होता. त्यास करुणा आली आणि 'गणपतीची प्रसन्नता झाली तर तुमचे कल्याण होईल. बरे करण्याचे माझ्या हातात नाही. तुमचे कल्याण असो' असे ह्मणून तो ध्यानस्थ झाला. शमीका आणि मंदार या दोघांसही वृक्षयोनि लागलीच प्राप्त झाली! इकडे शौनक गुरुजी मंदाराची काळजी करीत होता. बायकोला घेऊन मंदार आज उद्यां येईल, अशी कल्पना करून वाट पाहून थकला. इकडे और्वाच्या घरीही या दंपत्याची वार्ता नव्हतीच. तेंव्हां और्व व शौनक हे दोघेही शोक करीत या नूतन दंपत्याचा जिकडेतिकडे शोध करू लागले. विचारतां विचारतां त्यांस असा पत्ता लागला की, भृशुंडीच्या शापाने ते दंपत्य 'वृक्षयोनिला' गेले आहे! मग ते और्व व शौनक

भृशुंडीच्या आश्रमात आले तेथे सर्व हकीगत ऐकल्यावर त्यांनी भृशुंडीची प्रार्थना करून त्यापासून गणेशदीक्षा घेतली आणि कडक तपश्चर्या करण्यास आरंभ केला कडकडोत उपास करून बारा वर्षे तपश्चर्या झाल्यावर त्यांस गणपति प्रसन्न व प्रकट झाले. या दोघां तपस्व्यांनी हात जोडून गणपतीची स्तुती केली, भ्रांति-विनाशक भक्ति मागितली व 'शमीका आणि मंदार यांस पुनः मनुष्ययोनीत आणा' असे मागणे मागितले. विघ्नहराने त्यांस अखंडभक्तीचा वर दिला, पण शमीमंदारांच्यासंबधाने ते ह्मणाले 'माझ्या भक्तांनी जे केले आहे, ते मला अन्यथा करता यावयाचे नाही. भृशुंडी अति शांत स्वभावाचा आहे, त्याला राग आला यावरून या दंपत्याचा अपराध फारच मोठा असला पाहिजे. ह्मणून मला या उभयतांस मनुष्यरूपात आणणे इष्टही वाटत नाही. तथापि तुमच्या भक्तीने मी संतुष्ट झालो आहे; ह्मणून असे करतो की, या पुढे शमीच्या व मंदाराच्या मुळाजवळ माझी वस्ती असत जाईल. हे वृक्ष सर्ववंद्य होतील. त्यांचे दर्शन-स्पर्शन झाले असता मोठमोठाली महापापे जळून भस्म होतील. शमीपत्राने माझी पूजा केली, मला एक मंदाराचे पुष्प वाहिले तर मला अतिशय आनंद होऊन मी माझ्या भक्तांच्या सर्व मनकामना पूर्ण करीन. मला दूर्वा जशा प्रिय आहेत तसेच एक शमीपत्र किंवा मंदारपुष्प मला प्रिय होईल. सारांश हे पाप-विनाशक वृक्ष होतील.' असे सांगून पुनः ह्मणाले की, 'जर माझी भक्ती तुह्माला प्रिय असेल तर मंदारवृक्षाची मूर्ति करून तिची यथाविधि पूजा करीत जा, शमी, दूर्वा व मंदारपुष्प हे मला वाहण्यास विसरू नका. पण मला तुळसी मात्र वाहात जाऊ नका' असे ह्मणून गणपति अंतर्धान पावले, दोघांही ऋषींस आनंद

होऊन ते आपआपल्या घरी गेले व गणपतीनी सांगितल्याप्रमाणे त्याची भक्ति व पूजा करू लागले.

## शूद्राला स्वानंदवासी लोकाची प्राप्ती

सुत:–मुनिहो! द्रविड देशांमध्ये एक महापापी शूद्र होता. तो शिकारीकरिता रानांत गेला असतां वाघाच्या तडाक्यात सापडून मरण पावला पण त्याला वाघाने मारले तेथे एक शमीचे पत्र पडले होते. त्याच्या प्रभावाने त्या पाप्याला स्वानंदवासी लोकांत जाण्यास मिळाले! तेथे गणेश दूत व यमदूत यांचा तंटा होणार होता, पण यमाने आपल्या दूताची समजूत घालून त्यांस आज्ञापिले की 'ज्या कोणास शमी, दूर्वा, मंदारपुष्प यांचा स्पर्श झाला असेल, जे निरनिराळ्या नांवांनी गणपतीचे अखंड स्मरण करीत असतील; त्याच्यावर तुम्ही आपला अंमल बिलकूल चालवू नये.'

## गणपतीला दूर्वा प्रिय का?

सुत :–नंतर मुद्गलाने दूर्वेचे चरीत्र सांगितले ते असे ब्रह्मदेवाने चराचर सृष्टि उत्पन्न केली तेंव्हां, त्याच्या 'खाण्यापिण्याची काय व्यवस्था करवी?' अशी चिंता त्याला उत्पन्न झाली. या चिंतेच्या प्रशमनासाठी तो गणपतिचे ध्यान करू लागला. कांही वेळाने त्याच्या अंगातून पुष्कळ हातपाय, पुष्कळ तोंडे, पुष्कळ डोळे इत्यादि इंद्रियावय आहेत अशी एक शोभायमान देवी उत्पन्न झाली. तिला पाहून 'अन्न देऊन सर्वांचे पोषण करण्याचे सामर्थ्य या देवीला आहे,' असे ब्रह्मदेवाला समजले व तो मोठा आनंदित झाला. देवीने ब्रह्मदेवाला नमस्कार केला, आणि 'काय आज्ञा आहे

असे नम्रतेने विचारले. तेंव्हा 'तप कर व नतर सर्वांचे अन्न तू हो, तुला दुर्वा हे नाव मिळेल' असे ब्रह्मदेव आशीर्वादपूर्वक ह्मणाले. ते ऐकून ती देवी अरण्यात गेली आणि एकाक्षरी मंत्राचा जप करून निराहारपूर्वक व गणेशध्यानपूर्वक हजार वर्षे तिने तपश्चर्या केली. गणपतो प्रकट झाल्यावर तिने त्यांची अथर्वशीर्ष मंत्रानी स्तुति केली. नंतर 'सर्व सृष्टीचे पोषण करणारी तू होशील व सर्व वंद्य होशील' असा तिला आशीर्वाद देऊन गणपति निजधामास गेले. मुनिहो! ह्या दूर्वा देवीच्या मस्तकापासून षड्रसांनी युक्त असे स्वर्गान्न उत्पन्न होते. तिच्या उदरातून जे सुरस अन्न उत्पन्न होते, ते पृथ्वीवरील जीवांचे पोषण करते; आणि तिच्या पायापासून उत्पन्न होणारे अन्न पातालवासीयास उपयोगी पडते. याप्रमाणे आपण उत्पन्न केलेल्या जीवास अन्न पुरविण्याची दूर्वा देवोने कामगिरी घेतली, व सर्व जीव धष्टपुष्ट झाले. असे पाहून ब्रह्मदेवाला आनंद झाला, आणि 'तू अन्नाची अधिपति होशील.' असा आशीर्वाद देऊन तिच्यावर ब्राह्मणाकरवी ब्रह्मदेवाने अभिषेक केला. पुढे काही कालाने ह्या ऐश्वर्यवती देवीला गर्व झाला. गणपति विस्मरण झाले ह्मणून तिच्या सुखाचा नाश करणारो विघ्नेही उत्पन्न झाली. पार्वतीचे व तिचे भांडण होण्याचे कारण नसताही दूर्वादेवी ताठ्याने ह्मणू लागलो की, 'अन्नस्वरुप मी आहे ह्मणून मी अन्नपूर्णा आहे; जगदंबा नव्हे!' असे भरसमाजात ती उन्मत्तपणाने बडबडू लागली पार्वतीने बराच वेळ ही निंदा सहन केली. पण पुढे दुर्वादेवीचे बोलणे जास्त टोचणारे होऊन असह्य झाल्यावर 'तू पृथ्वीवर तृणरूप होऊन रहा' असा जगदंबिकेने तिला शाप दिला. या शापाने दूर्वादेवीचा मद उतरला.

ती पुनः गणेशनामाचा जप करू लागली. तिने तपश्चर्या केली आणि गणपतीस प्रसन्न करून घेऊन त्यापाशी दृढभक्तिचे मागणे मागितले. शेवटी अशीही प्रार्थना केली की, 'पार्वतीने मला जो शाप दिला आहे, त्यापासून माझे रक्षण करा.' गजाननानी आशीर्वाद दिला की, 'अंशरूपाने मात्र तू पृथ्वीवर तृणरूप घेऊन अवतरशील व पार्वतीचा शाप खरा होईल. पण मुख्य स्वरूपाने स्वर्गात पूर्वीप्रमाणे तू वास करशील. पृथ्वीवर तू शतमूल ( शंभर मूळे आहेत अशी ) व शतांकुरा होऊन अमृतरूप धारण करशील. याचप्रमाणे तूं सर्वमान्य, सर्वपूज्य व मंगलदायिनी होशील. तुझे पत्र मला अर्पण केले असता मला अतिशय संतोष होईल. माझ्या ठिकाणी तुझी भक्ति दृढ राहील.' असे म्हणून गणपति अंतर्धान पावले व देवी गणपतिभक्त झाली. गणपतीला दूर्वा कां प्रिय आहेत त्याचा असा हा इतिहास आहे.

## पिशुनाची कथा

एकदा दंडकारण्यात राहणारा पिशुन नावाचा एक दुर्बुद्धि व पापी असा अंत्यज होता. पंचमहापातकांपैकी कोणतेही पाप करण्यास त्याला यत्किंचितही शंका येत नसे. हा एकदा ब्रह्महत्त्या करण्यास प्रवृत्त झाला असता तेथे काही शस्त्रधारण केलेले क्षत्रिय आले व मारामारी करून ब्राह्मणास मुक्त करते झाले. या मारामारीत पिशुन मारला गेला. पुढे यमलोकी जाउन तो आपल्या पापाचे फळ भोगीत असता पांचव्या दिवशी ज्या रसरशीत कढईत त्याला ठेवला होता, ती कढई एकदम शांत झाली. हा चमत्कार काय आहे, हे पाहण्याकरिता यमधर्म ध्यानस्थ झाला. तेंव्हा त्यास कळले की, या

पिशुनाच्या शरीरावर एका गाणपत्यांच्या मस्तकावरील दूर्वा पडली तिचा हा प्रभाव आहे !

## जनकाचे गर्वहरण व त्रिशिरा ब्राह्मणास गणेशाचा आशिर्वाद

एकदा जनकाला आपल्या कर्तृत्वाविषयी व दातृत्वाविषयी अतिशय गर्व झाला होता. त्याचा नाश करण्यासाठी एका आजारी ब्राह्मणाचे स्वरूप धारण करून 'मला भूक लागली आहे, कांही खावयास दे' असे राजा जनकाच्या येथे जाऊन गणपति त्याला ह्मणाले. 'आपल्या येथून ब्राह्मण अतिथि विन्मुख होऊन जाणारच नाही,' असा गर्व वाहणाऱ्या जनकाने ब्राह्मणाला उत्तम प्रकारचे अन्न तयार करून वाढविले. ते संपले; व ब्राह्मणाने आणखी अन्न मागितले, याप्रमाणे अनेक वेळ झाल्यावर राजाच्या येथील शिजविलेले अन्न संपले, कोरड्या अन्नांनेही ब्राह्मणाचे पोट भरेना, तेंव्हां नगरींतील घरांत शिजवलेले व कोरडे अन्न ब्राह्मणास वाढले, तरी सर्वभक्षक अग्नीप्रमाणे सर्वभक्षक ब्राह्मणाचे समाधान होईना. जवळच्या गांवांहून होते नव्हते तेवढे अन्न आणले परंतु 'मला आणखी वाढ' असे ब्राह्मणाचे ओरडणे संपेना. आतां हा ब्राह्मण राजासच खाऊन टाकतो की काय, असा प्रसंग निर्माण झाला! राजास कळले की, आपला कर्तुत्वाचा व दातृत्वाचा अभिमान व्यर्थ आहे. इकडे गणपति घरोघर हिंडून 'मला खावयास द्या' 'मला खावयास द्या' असे ओरडत हिंडत राहिले. कशानेंही त्यांचे समाधान होईना. ही ओरड अति दरिद्री त्रिशिरा नामक ब्राह्मणांने ऐकली. त्याने गणपति पूजनासाठी आणलेल्या दूर्वांपैकी एक दूर्वा

पुढे करून 'एवढेच काय ते मजपाशी देण्यासारखे आहे ते मी भक्तिपूर्वक आपणास अर्पण करतो. कृपा करून याचा स्वीकार करावा' ही भक्ति व विनय पाहून गणपति आनंदित झाले व ही महाभक्तीने समर्पण केलेली दूर्वा घेऊन गणपतीची क्षुधा शांत झाली. प्रसन्न होऊन त्यांनी आपले स्वरूप प्रकट केले. तो दरिद्री ब्राह्मण व त्याची स्त्री ह्यांनी केलेल्या स्तोत्राचा देवांनी स्वीकार केला आणि अखंडभक्ति देऊन 'तुह्मांस मोक्ष मिळेल.' असा आशीर्वाद दिला. ह्या आशीर्वादाबरोबरच लक्ष्मीसान्निध्याचा लाभही ह्या दरिद्री कुटुंबास झाला. राजा जनकाला हा वृत्तांत कळल्यावर तोही स्वगर्वाचा त्याग करून गणेशभक्त झाला.

## जनक व नऊ योगी संवाद. नऊ योग्याचे जनकाच्या प्रश्नास उत्तरे

एकदां त्याच्या येथे नऊ योगी आले. ते दिगंबर वृत्तीने रहात असत. त्यांचे वैराग्य, त्यांची भक्ति ही सर्व विलक्षण असत. ते मोठे गणेशभक्त होते. राजाने त्यांचा योग्य सत्कार केला आणि त्यांचे चरणसंवाहन करीत असतां जनकाने त्यास प्रश्न केला की 'मोक्ष मिळविण्याकरितां जीवाने काय करावे? तेंव्हां नऊ योग्या-पैकी 'कवि' ह्मणाला जीवाने स्वधर्म पाळून सात्विक वृत्तीने सर्व श्रौत व स्मार्त कर्मे करावी, व ती सर्व गणपतीस निष्का-मत्वाने समर्पण करावी. सर्व काल गणपतीचे ध्यान करावे. एकाक्षरी मंत्राचा जप करावा ह्मणजे सर्व विघ्नांचा नाश होऊन शांतियोगाचा लाभ होईल. सारांश गणपतीचे भजन हाच मुख्य उपाय आहे.'

जनकाने विचारले, चिंतामणीचे स्वरूप काय? या प्रश्नाला 'हरीने' उत्तर दिले 'क्षिप्त, मूढ, विक्षिप्त, एकाग्र, निरोधक असे जे चित्ताचे पाच प्रकार आहेत त्यास प्रकाशित करणारा तो चिंतामणि होय. या चिंतामणिचे भजन केले पाहिजे. या गणपति-भजनाने चित्ताचा, चित्तपंचकांचा नाश केला म्हणजे चिंतामणीचा व शांतीचा पूर्ण लाभ मिळतो

**जनक** :– असा सर्व प्रकाशक म्हणजे ज्ञानरूप जो चिंतामणि आहे त्याला शरीरप्राप्ति कशी होते? 'अंतरिक्षाने' उत्तर दिले : 'मानेच्या खाली जो शरिराचा भाग आहे त्याच्या डाव्या भागात राजसगुण, उजव्यात तामस व मध्ये सात्विक, असे शरीरभाग असून या सर्वांचा योग, हा या शरीराचा चवथा भाग आहे. तेथे अहंकार धारण करणारा निराकृति गणनायक असतो. आणखी ज्यापासून सर्व उत्पन्न होते व जेथे सर्वांचा लय होतो, पण जे स्वतः कधी उत्पन्न होत नाही व कधी पावत नाही, ते 'गज' नावाचे ब्रह्म वेदामध्ये सांगितले आहे. ग म्हणजे ज्यामध्ये सर्वांचा प्रलय होतो ते, ज्यामध्ये सर्वांस जाऊन लीन व्हावे लागते ते तत्व होय. 'ज' म्हणजे ज्याच्यापासुन सर्वांचा जन्म होतो ते तत्व होय. हे असे 'गज' नामक ब्रह्म आहे. हे गजरूपी ब्रह्मच गणेशाचे मस्तक असते. आतां सांगितलेला चार प्रकारचा देह व गजरूपी मस्तक ह्या दोघांचा योग झाला म्हणजे गणपति साकार होतो. नराकृति 'संप्रज्ञातमय,' व गजाकृति शिर 'असंप्रज्ञातरूप'

आहे. यांचा योग म्हणजे गणपति शरीरि होणे हे होय. याचा अवतार व हे शरीरधारणा केवळ भक्तीच्या भोगाकरताच होते!

**जनक** :— माया म्हणजे काय? प्रबुद्ध :— गणपतीच्या वामांगी सिद्धि आहे, व दक्षिणभागाला बुद्धि आहे. सिद्धिचा पुत्र लक्ष व बुद्धीचा पुत्र लाभ, या दोघांचा खेळ सुरू झाला म्हणजे जीवास जो मोह पडतो नो मायाकृत असतो. पुण्यपापाकडे लक्ष असेल तर सुख-दुःखाचा लाभ होतो. ब्रह्माकडे लक्ष असेल तर योगलाभ होतो. सिद्धि ही भ्रांति उत्पन्न करणारी आहे. निष्काम बुद्धीने मोह निवृत्त होतो. पण सकाम बुद्धी मात्र जास्तच मोह उत्पन्न करते. हीच माया! आपण पूर्ण असताही 'पूर्ण नाही' असे वाटणे, याचे नाव माया आहे.

**जनक** :— गणेश जर भक्तिप्रिय आहे तर भक्तांना मोह कसा होतो? पिप्पलायन म्हणाला, राजा, गणपतीने हे मायामय जग क्रीडा करण्यासाठी उत्पन्न केले आहे. हे दोन प्रकारचे आहे. एक स्वार्थाने मोहित झालेले जग आणि दुसरे योगमार्गाचे ज्ञान होऊन शांति देणारे जग. योगमार्गाने गणेशब्रह्माचे ज्ञान करून घेऊन अनन्यभावाने परमभक्ति केली असता तो जीव मुक्त होतो. संसारात पडलेले स्वार्थ-युक्त जीव मायेची बाहुली होऊन गणेशसाक्षीने गणपतीच्यां आज्ञे-नुसार कर्म करणाऱ्या मायेचे दास होतात.

**जनक** :— कर्म ह्मणजे काय ते मला उलगडून सांगा. आवि-र्होत्र म्हणाला :— स्वधर्मयुक्त देहसौख्य व जन्ममृत्यु देणारे विधियुक्त

कर्म ह्याला कर्म म्हणावे. स्वधर्मशून्य व विधिशून्य जे पापरूप कर्म त्याला विकर्म म्हणावे. हे कर्म देहाला दुःख व दुर्गति देणारे असते; परंतु ब्रम्हार्पण स्वरूपाने मुक्ति हा हेतु धरून जे नित्य सत्कर्म होते, मोक्ष देणारे असते, त्याला अकर्म अथवा कर्मशून्यता असे म्हणावे. नैष्कर्म्याची स्थिति प्राप्त झालेले लोक शुक्ल मार्गाने जातात. हे सर्व विश्व कर्मयोगमय आहे. हा कर्मयोग सगुणात्मक अथवा निर्गुणात्मक असतो. कर्म न करणे याला अकर्म म्हणत नाहीत. सत्कर्म करून ते ब्रम्हार्पण करणे आणि कर्तृत्वाचा अभिमान न धरणे याला मोक्ष देणारे नैष्कर्म्य अथवा अकर्म म्हणतात. ह्या नैष्कर्म्याचे आचरण विधिपूर्वक करणे हाच वेदप्रणीत कर्मयोग आहे. याहून इतर जी कर्मे आहेत ती संसारात ढकलणारी म्हणून निर्गुणात्मक नव्हेत.

**जनक** :- ज्ञान म्हणजे काय ते मला सांगा.

**द्रमिल** :- अंतःकरणामध्ये जे स्फुरण होत असते, त्याला ज्ञान म्हणतात. स्फुर्ति उत्पन्न करणारे ब्रम्ह तेथे असते. हे नामरूप-शून्य, अनाद्यनन्त व नित्य चिरंजीव ब्रम्ह ज्ञानरूपच आहे; व ब्रम्हानुभव देणारे हे ज्ञान जाणणे हाच ज्याचा स्वभाव झाला म्हणजे ज्याची ज्ञानदृष्टि झाली तो इतर सर्व ज्ञानाचा लय या सत्य व स्वानंदरूप ब्रम्हज्ञानामध्ये करतो.

**जनक** :- आनंद म्हणजे काय, सहजाचे स्वरूप काय व ब्रम्हभूयत्व म्हणजे काय ते सांगा.

**चमत्व :–** बाह्यांतर भेद नाहीसा झाला म्हणजे सर्वत्र सम- स्थिती प्राप्त होऊन नाना द्वंद्वामध्ये, ( ह्या विश्वामध्ये, ) समवृत्तीने असणारा सत्यासत्यमय व स्वानंदवासी जो आत्माराम तोच आनंदरूप आहे, तोच आनंद आहे, यालाच परमानंद अथवा ब्रम्हानंद म्हणतात हे समजणे हा गणेशयोग आहे. हा योग कठिण पण मोक्षदायी आहे. योगसाधनाने ज्यांची समवृत्ति झाली त्यांसच हा आनंद मिळतो. द्वंद्वबुद्धि असली म्हणजे मोह उत्पन्न होतो; कर्म, ज्ञान आणि समवृत्ति ह्यांच्यापासून उत्पन्न होणारे मोह ज्या स्वरूपात नसतात, वेद ज्याच्यासंबंधे नेति नेति असे म्हणतात ते सहज ब्रम्ह आहे, ते स्वच्छंद, स्वतंत्र आणि सनातन आहे. आता ब्रह्मयुक्त ह्मणजे काय ते सांगतो: जे स्वतंत्र नाही किंवा परतंत्र नाही, जे त्रिविध मोहांनी युक्त नाही किंवा मोहशून्य नाही, जेथे ब्रह्म आणि जगत यांचा संयोग होतो, जेथे जीव स्वसंवेद्यमय ह्मणजे ब्रह्ममय होतो, जेथे भिन्न बुद्धि उत्पन्न होण्याला कारणच नसते, सारांश जेथे संयोगी माया व अयोगी गणेश यामधील भेद ह्मणजे मायासंयोग व मायावियोग या दोहोंच्या मधील भिन्न भाव नाहीसा होऊन दोघांसही सत्ता देणाऱ्या गणेशाचे स्वरूप प्राप्त होते, याला ब्रह्मभूयत्व ह्मणावे. गकार हा संयोगवाचक आहे व णकार हा अयोग्यवाचक आहे, ह्या संयोग व वियोग नामक गणाचा अधीश, स्वामी, जो गणेश, तो संयोगायोगवर्जित आहे, ह्मणजे तेथे संयोग नाही व अयोग नाही, तसेच उभयतामध्ये भेद नाही, अशी स्थिति आहे. त्याचे स्वरूपज्ञान ह्मणजे ब्रह्मभूयत्व होय.

**जनक** :- आता मला भक्तिचे स्वरूप सागा.

**करभाजन** :- हृदयांत आनंद उत्पन्न करणारी भक्ति नऊ प्रकारची आहे. ( १ ) गणेशगुणांची चर्चा भक्तिने व आनंदाने ऐकणे, याला **श्रवण** ह्मणतात. ज्याला श्रवणभक्ति प्राप्त झाली तो योगी श्रेष्ठ, गणेशगुणसंकीर्तन भक्तिने करण्याला अधिकारी होतो. गणेशाचे एक क्षणभरही विस्मरण न होणे म्हणजे अखंड स्मरण असणे, याला **स्मरण** म्हणतात. गणेशचरणकमल हेच शाश्वत आहे असे समजून ते मिळविण्याचा प्रयत्न करणे याला **पादसेवन** असे म्हणतात. गणपतीचे उत्सव व अर्चन नित्य करणे ह्याला **अर्चन** म्हणावे. गणेशापेक्षा श्रेष्ठ काही नाही असे भक्तिपूर्वक मानणे व त्याच्या आज्ञेविरहित एक पाऊलही न टाकणे याला **वंदन** असे नाव दिले आहे. गणेशचिन्हे धारण करणे हे **दास्य.** आपण जे काय मानसिक व शारिरिक कर्म करतो ते तदाश्रयाने व त्याच्या संतोषासाठी करतो, हे **सख्य.** गणेशापासून मी भिन्न नाही असे चित्तशुद्धिपूर्वक मानणे हे **आत्मनिवेदन.** अशी ही नऊ प्रकारची भक्ति आहे. संसारात जे सुख मिळत नाही, मोक्षाला ज्या सुखाचा पत्ता नाही, ते सुख आपल्याला निष्काम भक्तिसामर्थ्याने संपादन करता येते. वेदप्रणित गणेशस्वरूपावर निष्काम व निर्बोध विश्वास जेव्हा उत्पन्न होतो, तेंव्हा भक्तिसुखाचा रस आपल्याला चाखावयास मिळतो.

**सूतः**- याप्रमाणे या नऊ योग्यांनी जनकाच्या नऊ प्रश्नाला समर्पक उत्तरे दिल्यानंतर जनकाचा निरोप घेऊन ते निघून गेले. या दिवसापासून जनकराजाही अनन्य गणेशभक्त झाला आणि स्वतःचा, स्वकुलाचा आणि स्वजातीचा उद्धार करून अंती स्वानंदवासी झाला.

## गणपतीला तुलसीपत्र वर्ज कां ?

**सूत :–** दक्षाने विचारले की, गणपतीला तुलसीपत्र कां वर्ज आहे ? मुद्गल ह्मणाले : पूर्वी एकदां एक धर्मनिष्ठ दाता, मान्य व सर्वसद्गुणी असा धर्मध्वज या नावाचा राजा पृथ्वीचे पालन करीत होता. त्याला रूपलावण्ययुक्त अशी वृन्दा नावाची एक मुलगी होती, ती उपवर झाली तेंव्हा तिने आपल्या पित्यास सांगितले की, 'वैकुंठवासी विष्णुशिवाय मी कोणाचीही भार्या होणार नाही.' असे सांगून ती अरण्यात गेली आणि विष्णुध्यानपूर्वक विष्णूची तपश्चर्या करू लागली. पुष्कळ वर्षे तिने तपश्चर्या केली, पण विष्णु प्रसन्न होईना. तथापि तिच्या उग्र तपाचा एक परिणाम असा झाला की, दिव्यदृष्टि येऊन तिला अंतरज्ञान प्राप्त झाले; त्यामुळे केंव्हा केंव्हा तिच्या ध्यानामध्ये श्रीगजानन येत असत. त्याचे ते स्वरूप पाहून व विष्णुशिवआदिब्रह्मांमध्ये गणेशब्रह्म श्रेष्ठ आहे असे जाणून ती त्या सुंदर ( गणेशब्रह्माच्या ) स्वरूपाला मोहित झाली आणि ह्याचाच अंश विष्णु आहे, तेंव्हा गणपतीशी लग्न करण्यात जनाची किंवा मनाची कोणतीच हरकत नाही असा तिने विचार केला. पुढे गणेशाच्या अंशाने महागणपति तपश्चर्या करीत होते, तेथे ती गेली व हा योगी प्रसन्न व्हावा म्हणून तिने साध्य तेवढे सगळे उपाय केले; परंतु तिला यशोलाभ झाला नाही. 'महागणपतींनी तिला एकच उत्तर दिले :– 'तूं सकाम आहेस, म्हणून कोणातरी सकाम पुरुषाला तूं वर; मी तुझा अंगीकार करणार नाही.' असे सांगितले असतांही वृंदा ज्यास्तच लगट करूं लागली व आता अंगावर हात टाकणार असे पाहून गणेशांनी तिला शाप दिला की, 'तुझ्या अंत:करणांत राक्षसीभाव शिरला आहे. तूं दैत्यग्रस्त होशील व मला विवश करण्याचा

प्रयत्न केलास म्हणून तुला वृक्षयोनी प्राप्त होईल.' हा भयंकर शाप ऐकून तिच्या सर्वांगात कापरे भरले; ती रडावयास लागली व गणपतीच्या पाया पडली. ही तिची दीन स्थिति पाहून महागणपतीला दया आली. आणि त्यांनी तिला उःशाप दिला की, 'तुला काही दिवस राक्षसांची संगति घडेल, पत्नीव्रताने तूं चालत असतां विष्णु तुझ्या पातिव्रत्याचा भंग करील, पुढे तूं अग्निप्रवेश करशील. नंतर तुला वृक्षस्वरूप प्राप्त होईल आणि ज्या विष्णूचे तू आता आराधन करीत आहेस, तो विष्णु शालिग्राम स्वरूपाने तुझ्या जवळ नित्य राहून तुला सुख देईल. तू सर्वांना पूज्य होशील. तुझ्या लाकडाच्या माळा करून लोक आपल्या गळ्यात घालतील. देवही तुझी पूजा करतील, पण माझी पूजा मात्र तुझ्या पत्राने किंवा मंजरीने साध्य होणार नाही.' हा उःशाप ऐकून वृंदेला थोडासा आनद झाला; तरीपण गणपतीला आपण प्रिय नाही, हा विचार तिला त्रास देत होता, म्हणून ती पुनः अरण्यात गेली आणि पूर्ण भक्तीने गणपतीचे एकनिष्ठ आराधन करू लागली. तपश्चर्येची सांगता झाल्यावर गणपतींनी तिला वर दिला की, 'भाद्रपद शुक्ल चतुर्थीला जे माझे भक्त मला एकवीस पत्र्या वाहतील, त्यांत तुळशीपत्राचाही समावेश होत जाईल. त्या दिवशी मात्र मी तुझा अंगीकार करीन. अन्य दिवशी मला जो कोणी तुळसीपत्र वाहील त्याला माझा भक्त असे मी कधी मानणार नाही. इतकेच नव्हे तर त्यास रवरव नरकामध्ये कुचंबत रहावे लागेल, व वंशहानि, लक्ष्मीनाश, रोगप्राप्ति ही विघ्ने त्याला मृत्युलोकी रडावयास लावतील.' असे बोलून गणपती अंतर्धान पावले.

## गृत्समदाचा जन्म : गृत्समद्द्वारा ब्रह्मणस्पति सूक्ताचा जप

सूत :– शौनका ! आता तुम्हास गणपति पूजनाचा विधि सांगतो: पूर्वी वाचन्कवि या नावाचा एक तपोनिष्ठ व ब्रह्मज्ञ ब्राह्मण गृहस्थाश्रमांत रहात असे. त्याला मुकुंदा या नावाची तरुण व रूपसंपन्न भार्या होती. ती दोघेही वनातच रहात असत. एकदा रुक्मांगद या नावाचा राजा पाणी पिण्याकरता त्या आश्रमात यदृच्छेने आला. त्यावेळी वाचन्कवि मध्यान्ह संध्या करण्याकरता नदीवर गेला होता. सुंदर पुरुष पाहून ती कामबलाने एकदम वेडी झाली व स्त्री मर्यादेचा त्याग करून राजास अडवू लागाली. राजा रुक्मांगद हा पवित्र क्षत्रिय व गणेशभक्त होता. त्याने 'माता' म्हणून तिला नमस्कार केला; तथापि तिची समजूत पडेना. मग मात्र राजाने तिची निर्भत्सना केली आणि तो निघून गेला. पण त्याला त्या निर्लज्ज पापीणीने 'तू कुष्टि होशील. माझ्यासारख्या स्त्रियेचा अपमान करून तू जातो आहेस, तुला कोड भरेल.' असे ती म्हणाली व त्याक्षणीच त्याच्या अंगावर कोड उठले! राजाला परमदुःख झाले, त्याने आपल्या इष्टदेवतेचे, गणपतीचे, स्मरण केले. तेव्हा राजाच्या सुदैवाने तेथे नारदमुनि आले आणि त्यांनी त्याला उपदेश केला की 'चिंतामणि क्षेत्रात जाऊन तू स्नान कर म्हणजे तुझ्या या दुःखाचा परिहार होईल. राजाने त्या क्षेत्रीं जाऊन स्नान केले; व त्याची अंगकांति दिव्य झाली. त्या सत्वधीर राजाला घेऊन जाण्याकरता स्वर्गाचे विमानही आले. रुक्मांगदाने आपल्या मातापितरांसही चिंतामणि क्षेत्राचे दर्शन करविले आणि त्याचा व

सर्व प्रजेचा उद्धार केला. इकडे राजा गेल्यावर मुकुंदा कामविव्हल होऊन मूर्छित झाली. त्याच स्थितीत तिला झोपही लागली. ती निद्रित असतां देवांचा स्वामी इंद्र हा रूक्मांगदाचे स्वरूप घेऊन तेथे आला, आणि तिची कामशांति करून निघून गेला. त्या दिवशी मुकुंदेच्या उदरांत गर्भ राहिला. हा वृत्तांत बिचाऱ्या मुनीला कांही माहित नव्हता. पुढे मुकुंदा बाळंतीण होउन तिला मुलगा झाला. त्या मुलाचे नांव गृत्समद असे ठेवले. मुंज झाल्यावर वेदाचे साग्र अध्ययन गृत्समदाने अत्यल्पकाळांत केले. वाचक्नवि मुनिने आपल्या 'गणानां त्वा' या ऋग्वेदी मंत्रांची दीक्षा दिली व मुलानेही गणपति प्रसन्न होईल एवढे मंत्रपुरश्चरण केले. पुढे एकदां मगध राजाच्या येथे पितृ श्राद्धाचे वेळी गृत्समदाने क्षण घेतला होता. श्राद्धकर्म आटपून जेवणखाण झाल्यावर कांही वेळाने शास्त्राची चर्चा सुरू झाली. तेव्हां 'तूं क्षत्रिय रूक्मांगदाच्या पोटचा आहेस, शास्त्रीय पण विज्ञान शून्य भाषण करतो आहेस. तू आमच्या पंक्तीस बसण्यास योग्य नाहीस! चल येथून चालता हो.' असे अत्रि ऋषीने त्यास फर्मावले. हा अपमान गृत्समदास सहन झाला नाही. तो घरी गेला. तेथे आईकडून खरा वृतांत समजून घेतल्यावर आईला त्याने शाप दिला की 'तूं काट्याने भरलेली व अतिशय तिखट फळे येणारी एक वेली होशील, व तुझी सर्व लोक निंदा करतील.' तिनेही मुलाला शाप दिला की, 'तुझ्या पासून एक दुष्ट राक्षस उत्पन्न होऊन जगाला त्रास देईल. 'जगाला ताप देणारा पुत्र उत्पन्न करण्यापेक्षां आपण स्वतः देहत्याग करणे हे उत्तम आहे' असा तो निश्चय करणार तोच आकाशवाणी झाली की, 'तू जीव देऊं नकोस. तू जे गणपतीचे भजनपूजन करतोस ते जास्त नेटाने कर म्हणजे

तुला उत्तम प्रकारचे ऐहिक व परमार्थिक सुखप्राप्त होईल.' नंतर त्याने ब्राह्मणत्व प्राप्त करून घेण्याकरतां ब्रह्मणस्पति सूक्ताने जप केला आणि तो जप सफलही झाला.

## ब्रह्मणस्पति सूक्ताचा विधि गृत्समदाला गणेशाच्या वराची प्राप्ती

ह्या सूक्तांचा विधि असा आहे: 'गणानां त्वा' या मंत्राने षोडश अंगांचा न्यास करावा. एकवीस एकवीस ह्मणजे (४४१ वेळ) 'ब्रह्मणस्पति' सूक्ताची आवृत्ति करून अभिषेक व जप करावा. अशा आवृत्त्या एकवीस वेळ झाल्या ह्मणजे एक मंडल होते, गृत्समदाने सुक्तांचे एक महामंडल केले. तसेच तो प्रत्येक दिवशी एकशे एकवीस वेळ (गणानां त्वा) या मंत्राचा जप एकाग्र मनाने व नासाग्र दृष्टि ठेऊन करीत असे. असे हजार वर्षे त्याने हे व्रत चालविले. तेव्हा गणपति स्वतः प्रकट झाले. त्यांनी मोठ्या संतोषाने गृत्समदाच्या स्तोत्राचा स्वीकार केला, आणि 'तू ब्रह्मभूतामध्ये श्रेष्ठ असा ब्राह्मण होशील. 'गणानां त्वा' या मंत्राचा द्रष्टा होशील. यज्ञामध्ये तुझे प्रथम स्मरण करतील, व नंतर देवतांचे करतील. तू सर्वपूज्य होशील व माझे ठायी तुझी भक्ति दृढ होईल.' असे वर देऊन गणपति अदृश्य झाले. आपण तपश्चर्या केली होती तेथे गृत्समदाने ब्रह्मणस्पति या नावाचे क्षेत्र स्थापन करून, तेथेच तो गणपतीची अंतर्बाह्य पूजा करीत राहिला. अंतर्पूजा ह्मणजे मानसपूजा, या पूजेत एक अंगुष्ठमात्र आकाराची चतुर्भुज पाशांकुशधर अशी निर्विकारमूर्ति, आपल्या मस्तकांत जे सहस्रदल पद्म आहे तेथे ठेऊन त्या मूर्तिची मानसिक

राजोपचाराने पूजा करावयाची असते, ती होय. बाह्य पूजा ह्मणजे वेदप्रणीत, स्मृतिप्रणीत व पुराणप्रणीत पूजा होय. मानसपूजा स्थिर चित्ताने करणे अति श्रेयकर होते.

## गणेशलोकाचे वर्णन

सूत :- शौनका ! आता गणेशलोकाचे मी स्थूल वर्णन करतो. ' ज्याला स्वानंदलोक असे ह्मणतात तो पूर्णज्ञानाने किंवा पूर्ण गणेशभक्तिने मात्र प्राप्त होतो. तो लोक सर्वांपेक्षा श्रेष्ठ, वर्तुलाकार, स्वतःच्या आधाराने राहणारा व तेजाचे तेज, असा आहे. तेथे सगुण नाही किंवा निर्गुण नाही. तेथील लोक पुरुष नव्हेत, स्त्रिया नव्हेत किंवा नपुंसकही नव्हेत. चारी प्रकारचे जे भाव आहेत, त्यामध्ये नित्य राहणारा व स्वसंवेद्य (स्वतः मात्र जाणतां येण्यासारखा) असा हा लोक आहे. हा मायाशून्य लोक मायेच्या चारी प्रकारचा आधार असून तो साक्षीरूपाने असतो. हा अंखड व सर्वश्रेष्ठ आहे. या लोकांत क्षुधा, तृषादि कांही नाही. येथील आनंद सहज आहे, कृत्रीम नाही. या लोकांत सगुण, निर्गुण या प्रत्येकापासून होणारे सुख भोगावयास मिळते येथे अहंभाव नाही नहंभावही नाही. येथे सिद्धि आणि बुद्धि दासीस्वरूपाने असतात, इत्यादि लक्षणे गणेशलोकाची आहेत. येथे गणेशभक्त मात्र जातात. यालोकाला जाण्यासाठी शक्ति लोक, सौर, वैष्णव शांकर इत्यादि लोकास मागे टाकून जावे लागते. शांकरलोकापुढे एक मोठा अंधकाराचा प्रदेश आहे. त्या अंधकारातून जात असतां वाटेत भ्रामरिका देवी जन्ममृत्युप्रमुखभयांनी विमानस्थ पांथांस भिववीत असते. या भ्रामरिका देवीला 'आधार शक्ति' असे ह्मणतात. शरीरांत जीवात्मा आणि परमात्मा अशी स्वरूपे परब्रह्मास घ्यावयास

लावणे हे मायेचे काम आहे. तिचे अतिक्रमण केल्यावर ज्योतीरूपा शक्तीचा प्रांत प्रकट होतो. ही शक्ति जीवाच्या इच्छा पूर्ण करणारी आहे. ही 'असि' (आहेस) रूप आहे. मागे भ्रामरी म्हणून जी माया सांगितली ती 'त्वं' स्वरूप आहे. ज्योतीरूप शक्तीच्या मस्तकावर स्वानदलोक आहे. येथे आलेल्या जीवाला पुनः भ्रांति म्हणून उत्पन्न होत नाही. जे गणेशभक्त स्वानदवासी होतात, त्यांना जन्म-मरण चक्राचा उपसर्ग कालत्रयींही लागत नाही. हेच 'तत्' रूप होय.

## गणपतीचा कपिलास उपदेश

सूत :– हे विश्व नानाभावयुक्त झाले आहे म्हणजे नाना प्रकारचे जीव येथे आहेत. हे सर्व गणेशब्रह्माचे भक्त नसले तरी, पर्यायाने ते ब्रह्मभक्तिच करतात. शिवाय परमेश्वरी माया अशी कांही विलक्षण आहे की, तिचा निरास करून गणेशब्रह्माचे परमार्थस्वरूप समजून घेणे असेल तर गणेशब्रह्माचा प्रसादच झाला पाहिजे. शिवाय जीवांचे स्वभाव भिन्न असतात, याचे कारण त्यांचे भिन्न भिन्न पूर्वकर्म हे आहे. याप्रमाणे हौस, अज्ञान व पूर्वकर्म या तीन कारणांमुळे सर्व जीव गणेशब्रह्माचीच उपासना करतात असे नाही. कृतयुगांत गणेशब्रह्माची मात्र उपासना होत असे; त्रेतायुगांत पंचायतनपूजेचा ( सूर्य, विष्णू, शंकर, गणपति आणि शक्ति मिळून पंचायतन होते. ) उद्भव झाला व पांचही देव समानच आहेत अशी समजूत प्रचलित झाली. द्वापारयुगात गणपति हा शंकराचा मुलगा आहे, अशी न्यूनत्वताबोधक समजूत झाली आहे, आणि कलियुगात तर गौरीने आपल्या अंगच्या मळाने गजाननाला उत्पन्न केले, असा हीनतासूचक विचार प्रसिद्ध झाला आहे. याचा परिणाम

विघ्नावर अनेक प्रकारची संकटे उत्पन्न होणे हा होतो; तेंव्हा 'प्रत्येक कल्याणेच्छु जीवाने वेदप्रणीत गणेशब्रह्माचे ज्ञान करून घ्यावे, शास्त्रात सांगितल्याप्रमाणे त्याची उपासना करावी आणि स्वधर्मानुसार आपले आचरण ठेवावे ' असा गणपतीनी कपिलास उपदेश केला तोच मुद्गलाने राजा दक्षास सांगितला.

## पंचायतन, पूजा-मांडणी इत्यादिबाबत मार्गदर्शन

सूत :- पंचायतनपूजा व अग्निसेवा ही ब्राह्मणाची अवश्य कर्मे आहेत. प्रापंचिक व पारमार्थिक विघ्नांच्या नाशाकरता गणपतीचे पूजन, विद्येसाठी शंकराचे, यशासाठी विष्णूचे, आरोग्यार्थ सूर्याचे आणि सौभाग्यप्रीत्यर्थ देवीचे पूजन करावे, ह्या पंचायतन पूजेने विघ्ननाश, विद्या, यश, आरोग्य आणि सौभाग्य ही प्राप्त होतात. अग्निपूजा ही कर्मसिद्धीचे कारण आहे; पंचायतनपूजा व अग्निपूजा निष्कामभावनेने केल्या असता विशेष कल्याण होते. पंचायतनपूजेत गणपति मध्यस्थानी ठेऊन ईशान्येला विष्णु, आग्नेयीला शंकर, नैऋत्येला जगदंबा व वायव्येला सूर्य ठेवून पंचायतन सिद्ध करावे. कोणास शंकरपंचायतन किंवा विष्णुपंचायतन जास्त प्रिय असल्यामुळे त्याने आपल्यास इष्ट अशी पंचायतनाचीं मांडणी केली तरी, येथे सर्व मुख्य देव आहेत म्हणून पचायतनपूजा सर्व देवास व देवेश्वरास प्राप्त होते. पंचायतनातील ह्या मूर्ति त्या त्या देवतेची चिन्हे मात्र आहेत. येथे शैवांनी विष्णूची, किंवा वैष्णवांनी गाणपत्याची निंदा करण्याचे कारण नाही. गणपति हे सिद्धिबुद्धियुक्त असल्यामुळे व सिद्धिच्या हाती धर्म, अर्थ, काम, व मोक्ष हे चारो पुरषार्थ असतात म्हणून व बुद्धिच्या आधीन राहून कर्ता कर्म करतो

म्हणून, प्रत्येक जीवाने स्वधर्म पाळून गणेशपूजन करणे हे अत्यंत अवश्य आहे.

## गणेशभक्ति करणाऱ्या साधकांना मार्गदर्शन

सूत :—ग णेशअथर्वशीर्षामध्ये जे गणपतीचे ध्यान विहित केले आहे, ते ध्यान साधकाने दृढ करून नेहमी त्याचेच चिंतन करीत असावे. रोज शमीपत्र, मंदार पुष्पे व दूर्वा ह्यांच्यासह गणपतीची षोडशोपचार पूजा करावी. सर्व पूजेची द्रव्ये परमेश्वराला वाहत असता गणेशमंत्राची योजना करावी. दूर्वा वाहावयाचे वेळी इष्ट असेल तर 'काडात् कांडात्' हा मंत्र ह्मणावा. शमी, दुर्वा, मंदारपुष्प ही द्रव्यसाधने झाडावरून काढताना 'गणपतिपूजनाकरतां ही मी पूजा-द्रव्ये सिद्ध करीत आहे' असे ह्मणावे. रोज निदान एकविस दूर्वा तरी वाहाव्या. 'गणानां त्वा' हा मंत्र ह्मणावयाचा तो ऋषि, छंद, देवता, बीज व न्यास यांच्यासह ह्मणावा. गणपतीचे ध्यानातील रूप प्रकाशमय असावे. हे सर्व साधकाने ध्यानात ठेवून त्याप्रमाणे आचरण करावे.

हे गणेशव्रत यथाविधि केले असता सर्व ऐहिक व पारमार्थिक कल्याणांचा अधिगम होऊन अंती मोक्षप्राप्ती होते.

[ लंबोदरचरित्र समाप्त. ]